हायब्रिड ॲन्युईटी प्रकल्पाच्या निविदेतील शेड्युल्ड पी मधील अ.क्र.२.२ च्या अटी शिथिल करणेबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - हा.ॲ. -२०१८/प्र.क्र.२२/रस्ते-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १० डिसेंबर, २०१८

वाचा- १) हायब्रीड ॲन्युईटी निविदेच्या Concession Agreement मधील clause २७.२.१
२) हायब्रीड ॲन्युईटी निविदेच्या शेड्युल्स मधील शेड्युल पी चा clause २.२

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाने राज्यातील सुमारे १०,००० कि.मी. इतक्या लांबीच्या रस्त्यांचे केंद्र शासनाच्या हायब्रिड ॲन्युईटी मॉडेल अंतर्गत काम करण्याचे धोरण ठरविले आहे. ही सर्व १९५ कामे सर्वसाधारणपणे रू. २५० ते ६०० कोटी एवढ्या किंमतीची आहेत. या सर्व कामांचे अंदाजपत्रक व नकाशे तातडीने तयार करण्याचे निर्देश दिनांक २९/११/२०१६ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीत देण्यात आले आहे.आत्तापर्यंत एकूण १३० पॅकेजेसच्या निविदा प्रस्तावांना शासनाने मान्यता प्रदान केलेली आहे. हायब्रीड ॲन्युईटी निविदेच्या Concession Agreement मधील clause २७.२.१ अन्वये the Authority and the Concessionaire shall prepare a mutually agreed panel of 5 (five) reputable firms of Chartered Accountants having their registered offices in India (the “Panel of Chartered Accountants”) असे नमूद असल्याने हायब्रीड ॲन्युईटी अंतर्गत कामांसाठी नोंदणीकृत सनदी लेखापाल नेमणे आवश्यक आहे.

हायब्रीड ॲन्युईटीअंतर्गत प्रकल्पांच्या निविदेतील शेड्युल्स मधील शेड्युल पी मध्ये नोंदणीकृत सनदी लेखापाल पॅनेलवर घेण्यासाठी पात्रता निकष नमूद करण्यात आले आहेत. यात अ.क्र.२.२ मध्ये इच्छूक सनदी लेखापाल यांची मागील पाच आर्थिक वर्षातील एका वर्षाची उलाढाल ही रू.२५.०० कोटीपेक्षा जास्त असावी असे नमूद आहे. राज्यात असे सनदी लेखापाल अल्पसंख्येने असल्यामुळे सदर अट शिथिल करणेची बाब सदर नस्तीवर विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. मंत्रीमंडळ उपसमितीने धारीका संदर्भ क्र. हा.ॲ. -२०१८/प्र.क्र.२२/रस्ते-५, दि.३.१२.२०१८ अन्वये हायब्रीड ॲन्युईटीअंतर्गत प्रकल्पांच्या निविदेतील शेड्युल्स मधील शेड्युल पी मध्ये नोंदणीकृत सनदी लेखापाल पॅनेलवर घेण्यासाठीच्या पात्रता निकषामधील अ.क्र.२.२ मध्ये **इच्छूक सनदी लेखापाल यांची मागील पाच आर्थिक वर्षातील एका वर्षाची उलाढाल ही रू.२५.०० कोटीपेक्षा जास्त असावी** ऐवजी **इच्छूक सनदी लेखापाल**

**यांची मागील पाच आर्थिक वर्षातील एका वर्षाची उलाढाल ही रू.५.०० कोटीपेक्षा जास्त असावी** या बाबीस मान्यता प्रदान केलेली आहे.

३. मंत्रीमंडळ उपसमितीने मान्यता दिल्याप्रमाणे हायब्रीड ॲन्युईटीअंतर्गत प्रकल्पांच्या निविदेतील शेड्युल्स मधील शेड्युल पी मध्ये नोंदणीकृत सनदी लेखापाल पॅनेलवर घेण्यासाठीच्या पात्रता निकषामधील अ.क्र.२.२ मध्ये In **particular, each firm shall be required to furnish year-wise information relating to the names of all the companies with an annual turnover exceeding Rs. 25,00,00,000 (Rs. twenty five crore) whose annual accounts were audited by such firm in any of the preceding 5 (five) Accounting Years** ऐवजी **In particular, each firm shall be required to furnish year-wise information relating to the names of all the companies with an annual turnover exceeding Rs. 5,00,00,000 (Rs. five crore) whose annual accounts were audited by such firm in any of the preceding 5 (five) Accounting Years** असे वाचावे.

४. सदर बदलाबाबत सर्व मुख्य अभियंता यांनी उद्योजकांना अवगत करावे. Concession Agreement clause २७.२.१ च्या अनुषंगाने अधीक्षक अभियंता यांनी उद्योजकासमवेत परस्पर सहमतीने भारतातील प्रतिष्ठित कंपन्यांमधील पाच सनदी लेखापालांची निवड करावी. या पैकी उद्योजकाने एका सनदी लेखापालाची नियुक्ती करावी.

५. सदर प्रकरणी नमूद करण्यात येते की, निवड केलेल्या सनदी लेखापालांचे देयक संबंधित उद्योजकाने अदा करावे.

६. सदर शासन निर्णय मंत्रीमंडळ उपसमितीने मान्यता प्रदान केल्यानुसार काढण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०१८१२१०११५०५८२११८** असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrashekhar Prabhakar Joshi

Digitally signed by Chandrashekhar Prabhakar Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2c8893d1513ab2ea4a7f8c612a31ac748bd05ab00efd5e22f2d25c9872e36d29, serialNumber=423be4ff70a89bfc945ec5e481b972d568094459d7ff8219a1f968860a431f89, cn=Chandrashekhar Prabhakar Joshi
Date: 2018.12.10 12:00:34 +05'30'

**( चं. प्र. जोशी )**
**सचिव , रस्ते**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अप्पर मुख्य सचिव
३. मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री (ऊर्जा, नवीन व नवीकरणीय ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. मंत्री (रोहयो व पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. राज्यमंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा. मुख्यसचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई
९. अ.मु.स. (नियोजन) यांचे स्वीय सहाय्यक, नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई
१०. अ.मु.स. (वित्त) यांचे स्वीय सहाय्यक, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
११. प्रधान सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई
१२. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई
१३. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
१४. उपसचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई
१५. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.
१६. निवडनस्ती कार्यासन रस्ते-५ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.